**जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा, वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मध्ये देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मविसे १०/प्र.क्र.८५/२०१४/आस्था-३अ**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: १८ मार्च, २०१५

संदर्भ:-

१) **शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांकः मविसे १०/प्र.क्र.८५/२०१४/ आस्था-३अ, दिनांक २५.८.२०१४**
२) **श्री.व्ही.जी.पाटील, विस्तार अधिकारी (पंचायत), पंचायत समिती, राधानगरी, जि.कोल्हापूर यांचा दिनांक ३०.८.२०१४ चा विनंती अर्ज.**

**आदेशः-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ मध्ये नमूद दिनांक २५.८.२०१४ च्या आदेशातील अ.क्र.३ नुसार जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा, वर्ग-३ मधील श्री.व्ही.जी.पाटील, विस्तार अधिकारी (पंचायत), पंचायत समिती, राधानगरी, जि.कोल्हापूर यांना तात्पुरत्या पदोन्नतीने महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब या संवर्गात पीबी-२ वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८०० ग्रेडवेतन ४४०० या वेतनश्रेणीत सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, चंदगड, जि.कोल्हापूर या रिक्त पदावर पदस्थापना देण्यात आली होती.

२. तथापि, श्री.व्ही.जी.पाटील यांनी संदर्भाधीन क्र.२ मध्ये नमूद दिनांक ३०.८.२०१४ विनंती अर्जान्वये पदोन्नती नाकारली असल्यामुळे श्री.व्ही.जी.पाटील, विस्तार अधिकारी (पंचायत), पंचायत समिती, राधानगरी, जि.कोल्हापूर यांची संदर्भाधीन क्र.१ मध्ये नमूद दिनांक २५.८.२०१४ च्या आदेशान्वये तात्पुरत्या पदोन्नतीने महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब या संवर्गात पीबी-२ वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८०० ग्रेडवेतन ४४०० या वेतनश्रेणीत सहाय्यक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, चंदगड, जि.कोल्हापूर या रिक्त पदावर करण्यात आलेली पदस्थापना या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे. सदर तात्पुरती पदोन्नती रद्द केल्याच्या परिणामी श्री.व्ही.जी.पाटील हे जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा, वर्ग-३ मध्ये विस्तार अधिकारी (पंचायत), पंचायत समिती, राधानगरी, जि.कोल्हापूर या पदावर पूर्ववत कार्यरत राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१७११३३३०३२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra Namdev Patil

Digitally signed by Ravindra Namdev Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ravindra Namdev Patil
Date: 2015.03.18 10:47:07 +05'30'

(रविंद्र पाटील)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर
४. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
६. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
७. मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
८. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक
९. श्री.व्ही.जी.पाटील, विस्तार अधिकारी (पंचायत), पंचायत समिती, राधानगरी, जि.कोल्हापूर (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांच्यामार्फत)
१०. सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२/ कार्यासन-१६ब), मंत्रालय, मुंबई
११. कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१२. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.